**आमदार स्थानिक विकास कार्यक्रम**
**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी लेखाशीर्ष ४५१५ ००१२ अंतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीचे विधानमंडळ सदस्य निहाय निधी वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- स्थाविका-०४२१/प्र.क्र. ४५ /का-१४८२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ ऑक्टोबर, २०२१

**वाचा:-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दि. १२.७.२०१६
२) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. स्थाविका- २०२०/प्र.क्र. ७६ / का.१४८२, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१
३) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. स्थाविका-०४२१/प्र.क्र.४५/का.१४८२, दि. २३.४.२०२१, दि ५.५.२०२१ व दि. ८.७.२०२१

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२१" मंजूर झाले असून ते महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या अधिसंमतीनुसार महाराष्ट्र अधिनियम क्र. ५ म्हणून, महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक १५ मार्च, २०२१ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. आ मदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाकरिता रु. ११०१.०० कोटी एवढी तरतूद करण्यात आली आहे. यापैकी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये रु. ५२९.५० कोटी एवढी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. आता वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत १०० % निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार ३५३ विधीमंडळ सदस्यांना प्रति विधीमंडळ सदस्य रु. १.५० कोटी याप्रमाणे रु. ५२९.५० कोटी (रु. पाचशे एकोणतीस कोटी पन्नास लक्ष फक्त) एवढा निधी यापूर्वीच संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आला आहे.

२. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून विधीमंडळ सदस्यांना नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. स्थाविका- २०२०/प्र.क्र.७६/का.१४८२, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये प्रतिवर्ष रु. ४.०० कोटी याप्रमाणे निधी अनुज्ञेय करण्यात आला आहे. तथापि, सद्यस्थितीत सदर वाढीव निधी उपलब्ध करुन देण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मूळ अर्थसंकल्पात तरतूद केलेली नसल्याने यासाठी आगामी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे निधी अर्थसंकल्पीत करुन घ्यावायचा आहे. यास्तव सद्यस्थितीत दि. १ जानेवारी, २०२२ रोजी निवृत्त होणाऱ्या ८ विधान परिषद सदस्यांना प्रतिवर्ष रु. ३.०० कोटी एवढा निधी विचारात घेऊनच सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता प्रतिमहा रु. २५.०० लक्ष याप्रमाणे ९ महिन्याच्या कालावधीसाठी प्रति सदस्य रु. २.२५ कोटी एवढा निधी अनुज्ञेय ठरतो. यापैकी रु. १.५० कोटी एवढा निधी यापूर्वीच मंजूर करण्यात आला

असून उर्वरित प्रतिसदस्य रु. ०.७५ कोटी याप्रमाणे रु. ६.०० कोटी एवढा निधी ( रु. सहा कोटी फक्त) एवढा निधी सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत असून सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

३. जिल्हाधिकारी यांनी नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/ प्र.क्र.९६/ का.१४८२, दिनांक १२ जुलै, २०१६ च्या तरतुदींच्या अधीन राहून या निधीचे पुढील वितरण तात्काळ करावे. या निधीमधून आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत वेळोवळी अनुज्ञेय करण्यात आलेल्या बाबींवरील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र. ओ-१०
४५१५- इतर ग्राम विकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च,
(००) १०२ सामुहिक विकास
(०१) (००) (०१) आमदार स्थानिक विकास कार्यक्रम (४५१५००१२)
(योजनांतर्गत) (दत्तमत)
५३- मोठी बांधकामे

४. वित्त विभागाच्या क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ अन्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२९१५२८१००११६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.10.29 15:34:08 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
२) मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई
४) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, मुंबई शहर, मुंबई उपनगर, धुळे, अहमदनगर, सोलापूर, कोल्हापूर, अकोला व नागपूर
५) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, (सर्व)
६) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती मुंबई शहर, मुंबई उपनगर, धुळे, अहमदनगर, सोलापूर, कोल्हापूर, अकोला व नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई शहर, मुंबई उपनगर, धुळे, अहमदनगर, सोलापूर, कोल्हापूर, अकोला व नागपूर
८) वित्त विभाग (कार्यासन अर्थ-१६/व्यय-८),
९) नियोजन विभाग, अर्थसंकल्प कक्ष (का.१४२४),
१०) ग्रंथपाल व संदर्भ अधिकारी, नियोजन विभाग.

| शासन निर्णय क्र. स्थाविका-०४२१/प्र.क्र.४५/का.१४८२, दिनांक २९ ऑक्टोबर, २०२१ चे सहपत्र (रु. हजारांत) | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र | जिल्हा | वि.प.स. चे नाव | कार्यकाल समाप्तीचा दिनांक | वितरित निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुंबई शहर | श्री.अशोक (भाई) अर्जुनराव जगताप | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| २ | मुंबई उपनगर | श्री. रामदास गंगाराम कदम | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| ३ | धुळे | श्री. अमरिशभाई रसिकलाल पटेल | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| ४ | अहमदनगर | श्री.अरूणकाका बलभिमराव जगताप | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| ५ | सोलापूर | श्री. प्रशांत प्रभाकर परिचारक | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| ६ | कोल्हापूर | श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| ७ | अकोला | श्री. गोपीकिसन राधाकिसन बाजोरिया | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| ८ | नागपूर | श्री.गिरीशचंद्र बच्छराज व्यास | ०१.०१.२०२२ | ७५०० |
| | | वि.प.स एकूण (८) | | ६०००० |

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.10.29 15:34:24 +05'30'

( सं. ह. धुरी )

उप सचिव, महाराष्ट्र शासन